महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान धुळे शहराच्या रस्ते विकास प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :-नगरो-२०२३/प्र.क्र.२२७/नवि-३३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०८ मे, २०२३

संदर्भ:-

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट,२०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३. शासन निर्णयनगर विकास विभाग क्र: नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर २०१६.
४. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: संकिर्ण-२०१७/प्र.क्र.२३९/नवि-३३, दिनांक ११ मे, २०१७ व दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१८.
५. नगर परिषद शासन संचालनाल यांचे क्र.नपप्रसं/नगरोत्थान/धुळे म.न.पा.रस्ते प्रस्ताव/प्र.क्र. ८६३/२०२३/का.७/१५१३, दिनांक ०८ मार्च, २०२३.
६. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या दिनांक ११ एप्रिल, २०२३ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्या करिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत धुळे महानगरपालिकेचा रस्ते विकास प्रकल्प नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत संदर्भाधीन क्र. ५ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रकल्पास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक विभाग यांनी तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने दिनांक ११ एप्रिल, २०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसीनुसार सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत सादर करण्यात आलेल्या **धुळे महानगरपालिकेच्या रस्ते विकास प्रकल्पास** संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या व सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | रस्त्याचे नांव | कामाची मुळ किंमत |
|---|---|---|
| १ | महिंदळे येथील एकलव्य सोसा., मधील विक्की भवरे यांचे घर ते मोहन ओतारी ते कमल मोरे ते नितीन पवार यांचे घर, सिंचन नगर मधील विलास भारती यांचे घर ते प्रकाश पाटील यांचे घर, अनमोल सोसा., येथील सुरत बायपास ते सुनिल लोंढे यांचे घर, राजदिप सोसा., मधील बंडू सुर्यवंशी ते मनोज पाटील यांचे घर, सदिच्छा सोसा., येथील नामदेव अहिरे ते बैसाणे व संदीप सोसा., येथील इलेक्ट्रीक डी.पी. ते शंकर शिंद यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व आर.सी.सी. गटार व रिटेनिंग वॉल करणे. | २४१२४२२० |
| २ | चित्तोड गावातील होळी चौक ते महादेव मंदिर ते रेशन दुकान ते हनुमान मंदिर, प्रकाश पाटील ते नाना वाघ यांचे घर, प्रकाश दहिहंडे ते नंदू साळवे, बाबजी नेमाने ते वसंत सोनवणे, संत गणपत बाबा मंदिर ते चंदू दहिहंडे ते संजय उदिकर यांचे घर, आबा ठोंबरे ते कुणाल जनरल स्टोअर्स पावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | २४६७५१९० |
| ३ | महिंदळे मधील कल्याणी नगर येथील नरेंद्र बोरसे घर ते न्हावी शॉप व राजेंद्र सोनवणे ते परदेशी यांचे घर, कुवर यांचे घर ते ॲड. स्वाती यांचे घर, दिलीप मराठे यांचे घर ते संजय राठोड, न्हावी शॉप ते कर्वे ते खैरनार यांच्या घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व गटार करणे. | २४६३६४०७ |
| ४ | महिंदळे मधील मिनाई कॉलनी मधील बाबा वाघ यांचे घर ते कुणाल पाटील यांचे घर, पंडीत पाटील यांचे घर ते विजय देवरे यांचे घर, काशिनाथ पाटील यांचे घर ते योगेश खैरनार यांचे घर, विनय कॉलनी मधील योगेश माळी यांचे घर ते राजेंद्र गवते यांचे घर व सुरज हौ. सोसा. मधील निंबा मराठे यांचे घर ते प्रकाश पाटील यांचे घर, डॉ. शेजवळ यांचे घर ते आनंद सैंदाणे यांचे घरापावेतो सिमेंट कॉक्रीट रोड व आर.सी.सी. गटार करणे. | २४६२६११६ |
| ५ | अरविंद ऑईल मिल ते राष्ट्रवादी भवन पावेतो आर.सी.सी. गटार करणे व सोन्या मारोती कॉलनी, विद्युत नगर येथे मेन गटारला जोडण्यापावेतो आर.सी.सी. पाईप गटार करणे. | १६६९२७७७ |
| ६ | बारा पत्थर चौक ते फाशीपुला पावेतो रस्ता डांबरीकरण करणे बाबत. | १२५८३५०० |
| ७ | प्र.क्र.०५ देवपुर येथील श्रीकृष्ण कॉलनी, अभियंता नगर, शिवाजी नगर व सिध्दिविनायक कॉलनी मधील भागात सिमेंट कॉंक्रीट रोड करणे. | १२३०५८९१ |
| ८ | सप्तश्रृंगी माता मंदिर हटकरवाडी ते सुरत बायपास हायवे पावेतो रस्ता कॉंक्रीट व आर.सी.सी. गटार करणे. | १६५२१८७३ |
| ९ | राधाकृष्ण हॉटेल ते गोंदवलेकर महाराज मंदिरा पर्यंत व रामराव दादा बोर्ड ते नवनाथ मंदिर पावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | १६३२५७७० |
| १० | गोकर्ण हौ. सोसा., मधील जितेंद्र गहिवाड ते विलास कुलकर्णी यांचे घर, | २०४१७८६५ |

| | | |
|---|---|---|
| | भैय्या मराठे यांचे घर ते विलास कुलकर्णी यांचे घरापावेतो, नवग्रह गणपती मंदिर ते अनिल बुवा यांचे घर, मोर्या. हौ. सोसा., मधील डॉ. हेमंत चौधरी ते परेश निकम ते गोपी सोनार यांचे घर, मोर्या सोसा., बोर्ड ते गर्दे सर, डी.पी. रोड ते समर्थ साडी सेंटर, कैलास पाटील यांचे घर ते बागुल काका यांचे घर, लोकमान्य टिळक नगर मधील प्लॉट नं.४५ रामोळे सर यांचे घर ते विनायक गुरव, भदाणे सर यांचे घर ते सुरेश मोरे यांचे घर, मधुमंदार सोसा., मधील भरत वल्लभ पाटील यांचे घर ते सुरेश मोरे यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | |
| ११ | रमेश नगर मधील रेखा भामरे ते अंबिका बाजार बोर्ड, नवल देसले यांचे घर ते विजय वीरकर यांचे घरापावेतो, विनू भाऊ केराळकर घर ते भगवान ठीरात यांचे घर, डॉ. वाणी यांचे घर ते नवले यांचे घरापावेतो, खलाणे यांचे घर ते रत्नाबाई मोरे यांचे घरापावेतो, धनराज महाजन ते दिलीप वाणी यांचे घर, रेणुका नगर मधील आखाडे यांचे घर ते ठाकरे यांचे घर, बबन नगराळे यांचे घर ते राजहंस पवार यांचे घर, रेणुका माता बोर्ड ते दिनेश चावरे ते ठाकरे यांचे घर ते डांबरे यांचे घरापावेतो रस्ता कॉक्रीट व आर.सी.सी. गटार करणे. | १६३९३८४९ |
| १२ | प्र.क्र. १८ मधील अवधान भागातील निंबा नगर, रावसाहेब पाटील ते रुपेश पाटील ते ललित लोढा व स्टेट ऑफ इंडिया मागील शरद वाघ यांचे घर ते सुकलाल आबा यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व आर.सी.सी. गटार करणे. | १६४०३२०४ |
| १३ | माहेश्वरी नगर बोर्ड ते हनुमान मंदिर ते शाळा, दर्गा ते भूषण महानोर से ओपन स्पेस कॉर्नर, लिंगायत ते बाळू वाघ ते महेंद्र राजपूत ते सुनील गवळी यांचे घर, खंडेराव सोसा., बोर्ड ते राजू भंडारी ते पंडित खैरनार यांचे घर ते नाला गुरुदत्त मंदिर ते बाळू खताळ यांचे घर, अन्ना मिस्त्री यांचे घर से वाघ डी. पी. ते सुनील कदम ते शांताराम सोनवणे यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व आर.सी.सी. गटार करणे | १६४३२४२६ |
| १४ | भाईजी नगर भागात १) जयस्वाल चक्की ते प्लॉट नं.१०४, २) नायर मॅडम ते गिंदोडिया यांचे घर, ३) सौरभ शर्मा ते मयूर अग्रवाल यांचे घर, ४) निलेश अग्रवाल यांचे घर ते दुर्गा महाराज यांचे घर, ५) प्लॉट नं.७२ ते बंटी अजळकर यांचे घर, ६) पिंकी भाभी यांचे घर ते प्लॉट नं.२५, राजेंद्र अग्रवाल यांचे घर ते प्लॉट नं.८५, ७) ढाके नगर मधील विसपुते यांचे घर ते लक्ष्मी अग्रवाल, ८) अनुष्का अपार्टमेंट ते वराडे यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण व आर.सी.सी. गटार करणे. | २०५१९७२४ |
| १५ | मिरच्या मारोती शाळा येथील घनश्याम वर्मा ते संतोश जाधव प्रेस रिपोर्टर चंद्रकांत सोनार ते बबलू नवले ते वसंत नवले व चक्करबर्डी रोड हिंद कॉंक्रीट एरिया पावेतो कॉंक्रीट रोड व आर.सी.सी. गटार करणे. | १६४५८७०६ |
| १६ | प्र.क्र.०३ देवपूर भागात व्यंकटेश हॉटेल ते विद्यानगर, दत्त कॉलनी, संतसेना नगर ते Diversion पर्यंत रस्ता डांबरीकरण करणे. | १६७९२२३८ |
| १७ | धुळे मनपा हद्दीतील उमराव नगर, नंदनवन बँक कॉलनी, पोर्णिमा नगर भागात रस्ता डांबरीकरण करणे. | १२५७९९६६ |
| १८ | फाशी पूल ते भाईजी नगर पावेतो रस्ता डांबरीकरण करणे. | १२५९९७९१ |
| १९ | धुळे मनपा हद्दीतील प्रोफेसर कॉलनी भागात सिध्देश कॉम्प्युटर ते श्री. पाटील यांच्या घरापर्यंत नाल्यास संरक्षण भिंत बांधणे व चिरंतन हॉस्पिटल जवळ सुशी नाल्यावर छोटा पूल बांधणे. | १२४८८४९५ |

| | | |
|---|---|---|
| २० | भडक चाळ मधील शांती नगर मधील ओम शिव क्लिनिक ते श्रमगाथा घर, जयेश राजपूत ते आनंद पवार, धीरज वानखेडे ते गोंधली, बंड सोनार ते सागर महाजन घरा पावेतो सिमेंट कॉक्रीट रोड व गटार चे बांधकाम करणे | ८२८९३७५ |
| २१ | दगडी चाळ भागातील कपिल गायकवाडची गल्ली, श्री. राजू कांदेकर, श्री.शुभम चौगुले गल्ली मधील श्री. शुभम पाटील ते इथापे ते ठोंबरे राजू केले ते वाघबाई यांच्या घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ४१५०४४८ |
| २२ | शिवशक्ती कॉलनी मधील श्री. गाविंद लोहार यांचे घर ते पाटील यांचे घर ते प्लॉट नं.३१ ते सादरे यांचे घर व वाणी यांचे घर ते मिश्रा यांच्या घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ८२९२७१२ |
| २३ | सोन्या मारोती कॉलनी मधील दिलीप पाटील यांचे घर ते दिनेश पवार यांचे घर व श्री.सुनील वाघ ते उमाकांत मोर्या ते अमोल राऊत ते राकेश पाटोळे यांचे घर, योगेश गायकवाड यांचे घर ते बंटी पपय्या यांचे घर व विशाल मालचे ते सोनवणे यांचे घर व पिंजारी चाळ राहुल पगारे ते अनिल सालकर यांच्या घरा पावेतो सिमेंट कॉंक्रीट रोड व गटार चे बांधकाम करणे. | ८२६५४२० |
| २४ | गाळणकर नगर भागात श्री. सुलीन चौधरी यांचे घर ते पूजा पतंगवाले यांच्या मागील बाजुस व शिवप्रभू कॉलनी महील परदेशी यांचे घर ते साईधाम मंदिर मागील परिसर येथे रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ४१४४६०८ |
| २५ | जय मल्हार कॉलनी मधील कंपाऊड कॉर्नर ते संजू मराठे यांचे घर ते चौधरी यांचे घर व विशाल बडगुजर ते प्रयाग पाटील व चारु राजपूत ते देशपांडे लिंगायत यांच्या घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ४०७७७२७ |
| २६ | क्रांती चौक ते शिवशक्ती कॉलनी आपेन स्पेस पर्यंत रस्ता डांबरीकरण करणे व गटार चे बांधकाम करणे. | ८३०८५५६ |
| २७ | चितोड रावेर रस्ता ते स.नं.१५/२ पावेतो रस्ता कॉंक्रीटकरण करणे. | ८२५२९७३ |
| २८ | प्र.क्र.६ मधील निलकंठेश्वर नगर व राजरत्न नगर मधील गोरख महाले यांचे घर ते वाघ घरापावेतो ओपनस्पेस कॉर्नर ते राजपूत, गोकुळ पाटील यांचे घर ते विसपुते यांचे घरपावेतो व बच्छाव यांचे घर ते प्रशांत सोनवणे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व गटार चे बांधकाम करणे. | ८२४५०१९ |
| २९ | श्रीनगर मधील गिताई अपार्टमेंट ते नितीन बडगुजर यांचे घर ते ओपनस्पेस कॉर्नर ते सौरभ रानडे, ओपनस्पेस कॉर्नर ते बैसाणे यांचे घर ते प्रिया मिस रो हाऊस ते दिनेश काळे यांचे घर ते महादेव चौरे यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे | ८२९२७१२ |
| ३० | लिलाबाई चाळ येथील मनोहर मेडिकल ते छोटू शार्दुल यांचे घर, राजू अहिरे यांचे घर ते मधुकर देवरे व राउळवाडी येथील विघ्नहर्ता मंदिर ते सुनिल मोरे यांचे घरापावेतो रस्ता कॉक्रीटकरण करणे व मारुती मंदिर ते अंजनाबाई पाटील आशाबाई विभूते ते छोटू शार्दुल, म्हसोबा मंदिर ते चक्कीपावेतो चांगदेव बोरसे यांचे घर ते स्मशानभूमी पावेतो आर.सी.सी. गटार चे बांधकाम करणे. | ८२८७१८२ |
| ३१ | सिताई नगर बोर्ड ते डॉ. नायडू यांचे घर नर्सिंग क्वार्टर, संतोष महादू यांचे घर ते दिगंबर पाटील यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व गटार चे बांधकाम करणे. | ८२६३३५४ |
| ३२ | सुरत बायपास हायवे ते विनोद लष्कर यांचे घर ते सागर यांचे घरापावेतो रस्ता कॉंक्रीट व गटार चे बांधकाम करणे. | ८२१०३६३ |

| | | |
|---|---|---|
| ३३ | समता नगर मधील विजय गोसावी यांचे घर ते निलेश सुराणा ते बापू धिरे ते राजू धिरे ते गणेश जाधव ते नायर अन्ना ते संतोष अग्रवाल यांचे घरापावेतो व शितोळे यांचे घर ते लाडे कॉम्प्लेक्स पावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ८२६९४४५ |
| ३४ | प्र.क्र.१८ मधील दाते मंगल कार्यालय येथील अश्विन दाते ते प्रवीण पाटील, भूषण पाटील ते रवी जिवरग ते मराठे ते कैलास वाघ यांच्या घरापावेतो रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ८२७१५७३ |
| ३५ | लक्ष्मी वाडी मधील अवंतिका प्रोव्हिजन ते मुन्ना जयस्वाल ते उमेश वर्मा यांचे घर ते जगदीश पेंटर यांचे घरापावेतो सिमेंट कॉंक्रीट रोड व गटार चे बांधकम करणे. | ४०९०६८२ |
| ३६ | धुळे मनपा हद्दीतील प्रभाग क्र.५ देवपुर मध्ये जय गुरुदेव नगर भागात रस्ता कॉंक्रीट करणे. | ४१३०५३९ |
| ३७ | धुळे मनपा हद्दीतील प्रभाग क्र.५ एस.आर.पी. कॉलनी मध्ये श्रीकृष्ण डेअरी ते इंद्रपस्थ नगर मधील खुल्या जागे पर्यंत रस्ता कॉंक्रीट करणे. | ८२८४९६२ |
| ३८ | प्र.क्र.०१ वलवाडी भागात अश्विनी ट्रेडर्स ते फौजी स्टॉप पर्यंत Slab Culvert आणि रस्ता डांबरीकरण करणे | ८३६५६५३ |
| ३९ | धुळे मनपा हद्दीत जी.टी.पी. स्टॉप ते तिरुपती नगर व पुरषोत्तम (Diversion) रोड पर्यंत रस्ता डांबरीकरण करणे. | ८३७५३४४ |
| ४० | प्र.क्र.०३ मधील सिध्दी हॉस्पीटल जवळील भागात सौ.सुलोचना चौधरी यांच्या घरापासुन ते श्री. अजीत गीदगे यांच्या घरापावेतो रस्ता डांबरीकरण करणे | ४१६२३१० |
| ४१ | प्र.क्र.०३ मधील गोंदूर रोड येथे श्री. चेतन शहा यांच्या घरापासुन ते श्री. सानप यांच्या घरापर्यंत आणि श्री.सिसोदिया यांच्या घरापासुन ते श्री. प्रशांत सांगळे यांच्या घरापर्यंत रस्ता डांबरीकरण करणे | ४१७९५६७ |
| | **एकुण (रुपये)** | ४८६७८८५३१ |
| | Add GST १८ % | ८७६२१९३६ |
| | Labour Insurance Charges १% | ४८६७८८५ |
| | Royalty Charges | ६०३०८१३ |
| | Material Testing Charges | २५४८४६५ |
| | Total | ५८७८५७६३० |
| | Say Rs. | ५८.७९ CR. |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिनांका पासून १८ महिने** |

०२. **धुळे महानगरपालिकेच्या रस्ते विकास प्रकल्पाचा** वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ७०%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या ३०%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | धुळे महानगरपालिका | रु. ५८.७९ कोटी | रु. ४१.१५३ कोटी | रु. १७.६३७ कोटी |

०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **धुळे महानगरपालिकेच्या रस्ते विकास** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

अ) **प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा** :-

१. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन **धुळे महानगरपालिकेमार्फत** करण्यात यावे.

२. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

ब) **सुधारणांची पूर्तता** :- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

**I)** बंधनकारक सुधारणा :-

१. प्रकल्प मंजूरीच्या पहिल्या वर्षात महानगरपालिकेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यू नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

२. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.

५. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुनर्मुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.

६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६" च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.

७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८० % करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९० % या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

**II)** वैकल्पिक सुधारणा:-

१. मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुर्नप्रक्रिया व पुर्नवापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.

२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्य जलसंचय करावे.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे. जल लेखा परिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

क) निधी वितरणाची कार्यपद्धती:-

१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचा आर्थिक आराखडा (Financial Closure Report) नगर विकास विभागास सादर करावा. त्यानंतर व कार्यादेश दिल्यानंतर सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर तो हप्ता व स्थानिक स्वराज्य संस्थेचा त्या प्रमाणातील स्वहिस्सा हा एकत्र निधी, शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांना राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या १४ व्या वित्त आयोग (मुलभूत व कार्यात्मक) अनुदानाशी तसेच प्राप्त होणाऱ्या १५ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी यामधून मिळणारा निधी चिन्हांकीत करुन ठेवणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

४. राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेली पहिल्या हप्त्याची स्वहिश्याची रक्कम अशा एकत्रित रकमेच्या ७५ टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

५. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करण्याचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनाल यामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव सादर करावा.

६. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास राज्यशासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस राज्यशासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्यशासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल

त्याप्रमाणात संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे अशा योजनेत स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

७. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी संबधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

ड) <u>निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-</u>

१. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर ७ दिवसाच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व ९१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा धुळे महानगरपालिका आहे. त्यामुळे या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, धुळे महानगरपालिका यांची राहील.

२. सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया राबविताना संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयातील सूचनाचे तंतोतंत पालन करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

३. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

४. सदर <u>रस्ते विकास प्रकल्प</u> पूर्ण करताना राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पातील रस्ते पाणीपुरवठा/मलनिःस्सारण अशा कामांसाठी पुन्हा खोदावे लागणार नाहीत अशा पध्दतीने या रस्त्यांच्या कामांचे नियोजन करण्यात यावे. तसेच, सदर प्रकल्पात नमूद कामे मागील ५ वर्षात इतर कुठल्याही योजनेमधून करण्यात आलेली नाहीत याची पुनश्च खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित आयुक्त यांची राहील.

५. सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कार्यमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

६. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या वस्तूंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराच्या मार्गदर्शनाने करावी.

७. सदर प्रकल्पासाठी सुरुवातीला अनावश्यक स्वरुपात **कोणत्याही प्रकारच्या वस्तूंची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय**

**अनियमितता** समजण्यात येईल व त्यासाठी **संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार** धरण्यात येईल.

इ) <u>प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण :-</u>

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासनाने विहीत केलेल्या यंत्रणेंपैकी एका यंत्रणेकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहिल. तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

फ) <u>प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी :-</u>

१. महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयकृत बँकांकडून" तसेच "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासन मान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

२. तथापि, वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल.

ग) <u>प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती :-</u>

१. महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.

२. सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

३. प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे रस्ते विकास कराची आकारणी करणेबाबत सर्वसाधारण सभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे महानगरपालिकेवर बंधनकारक राहील.

ह) <u>इतर बंधनकारक अटी व शर्ती :-</u>

१. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची** राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

२. संदर्भाधीन क्र. १ ते ४ या शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२३०५०८१६४५११७६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.05.09 15:01:47 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्यसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा विभाग, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग(२), मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल,मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, नाशिक.
११. जिल्हाधिकारी, धुळे.
१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक विभाग.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, धुळे.
१४. आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे.
१५. निवडनस्ती, नवि-३३.